भाऊ-बीज-माला

— पुष्प २ रें —

# देवाघरचीं फुलें

संगीतक

( नाटिकासंग्रह )

लेखिका

सौ. सुशीला मराठे, बी. ए.

मूल्य १-८-०

: प्रकाशक :

वि. ज. घारपुरे
ॲडव्होकेट,
आंग्रेवाडी (नॉर्थ)
विठ्ठलभाई पटेल रोड,
मुंबई नं.

☆ ☆ ☆

आवृत्ती पहिली १९५२
कार्तिक शुद्ध द्वितीया, भाऊबीज
शके १८७४,
२० आक्टोबर १९५२

☆ ☆ ☆

: प्रमुख विक्रेते :

(१) व्हीनस बुकस्टॉल,
आप्पाबळवंत चौक, पुणे नं. २
(२) रामकृष्ण बुक डेपो,
प्रार्थनासमाज नाका, मुंबई ४
(३) प्रा. स.बा.हुदलीकर,
बालकमंदिर,
गणेशखिंड रोड, पुणे ५.



☆ ☆ ☆

: मुद्रक :

अ. चिं. रायरीकर
स्वस्तिक मुद्रणालय,
४३९ शनिवार पेठ, पुणे २

# चिमण्या पाखरांस--

ज्यांनीं निर्मियलें तदा निजगुणें
संगीत दारीं घरीं ;
लावोनी हुरहूर आणि चटका
गेलीं निघोनी दुरी । ।
बंधूचीं मम सान, गोड, हंसरीं
' संगीतकें ' जीं खरीं ,
ज्यांच्या आठवतात बालपणिच्या
लीला तशी चातुरी । ।

☆ ☆ ☆

तीं 'लीला' सु-गुणी, निरागस तसा
तो ' राज ' विंडा सुत ,
त्यां दोघां चिमण्यांस अर्पण असो
हें पुष्प कीं हृद्गत ।।

——आत्या

# परिचय—

चि. सौ. सुशीलाबाई मराठे यांचें मराठी साहित्यक्षेत्रांतील पदार्पण मोठ्या थाटानें होत आहे ही खरोखरीच अभिमानाची व मनःपूर्वक अभिनंदन करण्यासारखी गोष्ट आहे. सौ. सुशीलाबाईंचें नवें पुस्तक '**देवाघरचीं फुलें (संगीतक)**' आज भाऊबीजेच्या सुमुहूर्तावर वाचकांच्या हातीं देतांना मला खरोखरीच फार आनंद होत आहे. कारण सौ. सुशीचे वडील व मी सहाध्यायी असल्यामुळें मीं पाहिलेली ही एवढीशी छोटी छोकरी पुढें मोठी कवयित्री व नामवंत लेखिका होईल असें मला त्या वेळीं भाकीत करतां येणें शक्य नव्हतें. पण पूर्ण अभ्यास, मनन, चिंतन, अंतःकरणाची तळमळ व सभोंवारच्या जगा-कडे पहाण्याचा एक विशिष्ट दृष्टिकोण, या गोष्टीं अभ्यासानें साध्य झालेल्या त्यांच्या लिखाणांत पूर्णपणानें आढळून येतात. त्यांच्या लिखा-णांत प्रेम आहे, सहानुभूति आहे, अंतःकरणाचा ओलावा आहे व कळकळीचा जिव्हाळा आहे आणि या सर्व गोष्टीं आज प्रसिद्ध होत असलेल्या त्यांच्या पुस्तकांत प्रत्येक पानापानावर आढळून येत आहेत.

मुलांना नाटकें फार आवडतात. त्याचें कारण असें कीं ज्या ठिकाणीं जीवनांत झगडा निर्माण होतो त्या ठिकाणीं नाट्य निर्माण होतें. मुलांच्या जीवनांतही अशा प्रकारचे झगडे नाना तऱ्हांनीं निर्माण होत असतात, म्हणूनच बालजीवन हा नाट्याचा एक जीवंत झरा आहे असें आढळून येतें. हा नाट्याचा जीवंत झरा पारखून सौ. सुशीलाबाईंनीं अत्यंत हळुवारपणें त्याचा प्रस्तुत पुस्तकांत भरपूर उपयोग केलेला आहे. उदाहरणार्थ '**ताईची फजिती**' या नाट्यांत किंवा 'संगीतकांत'

"**कशाला बडबड, जा तिकडे धडपड**"
"**असूं दे असूं दे, तुला काय चिमुरडे**"
"**ज्याचें जळतें । त्यालाच कळतें**"
"**पुरुषांचा स्वभाव, लागेल कां ठाव**"—

किंवा ‘ **बाहुलीचं लग्न** ’ या संगीतकांत---

“ **बंद कर वटवट ! अल्का अल्किटले**
**चिडवलंस तर बघ हं, गडी फू करीन !** ”

किंवा ‘ **तिकडचं पत्र आलंय हो मला** ’ यांत

“ **काय म्हणालसि ‘ जात ’ ?**
**हो ग होय ! तीच करतेय घात !** ”
“ **पण लग्नाची गांठ, रेशमाची गांठ ।**
**सुटायची नाहीं मुळींच !** ”

किंवा ‘ **देवाघरचीं फुलं** ’ यांत

“ **गुलाबाच्या कळी, रुसून कां बसलीस ?** ”,
‘ **देवाकडे गेली ! खरंच कां बोलतां ?** ”
‘ **म्हणे गोजिरीं गोजिरीं मुलं**
**जणु देवाघरचीं फुलं !**
**अशीं कां कुस्करतात ?** ”

‘ **लागेल ना नजर** ’, ‘ **वाजव ना बांसरी** ’, ‘ **राजकुमार ध्रुव** ’ किंवा ‘ **बाल शिवाजी** ’, ‘ **सणांचें संमेलन** ’ व ‘ **मिराके प्रभु** ’ इत्यादि संगीतकांत कुठेंही पहा लेखिकेनें अत्यंत कौशल्यानें शब्दांची मांडणी करून, पदलालित्य साधून आपल्या थोर अंतःकरणाच्या ओलाव्याचें चित्रण मोठ्या बहारदारपणें केलेलें आढळून येतें.

“ **त्रास द्यायला आलांत रे कशाला ?** ”

‘ **सणांचे संमेलन** ’ माझ्या मतें फारच साधलें आहे. त्यांतील प्रत्येक सणाचें वर्णन फारच खुबीनें व बहारीनें केलेलें आढळून येते.

संगीतकाच्या किंवा मुक्तछंदाच्या चालीवर या सर्व नाटिकांचें लिखाण केलेलें असल्यानें शब्दमाधुर्य व पदलालित्य लेखिकेनें फारच कौशल्यानें साधलें असल्याचें आढळून येतें. एकुण एक शब्दाची निवड व पारख फार उत्तम साधली असल्यानें शाळांतून किंवा उत्सवप्रसंगीं हीं संगीतकें

प्रयोगरूपानें करून दाखविल्यास फारच उपयुक्त ठरतील अशी मला खात्री वाटते. लेखिकेनें आणखी अशीच संगीतकें लिहावी असा वाचकांचा व प्रेक्षकांचा अमर्याद आग्रह होणार हें भाकीत मी आतांच करून ठेवतों.

भाऊबीजेच्या निमित्तानें रा. विश्वनाथ जगन्नाथ घारपुरे, ॲडव्होकेट मुंबई यांनीं स्त्रियांचीं पुस्तकें प्रसिद्ध करण्याचा संकल्प करून आपल्या बहिणीला व महाराष्ट्राच्या उदयोन्मुख लेखिकेला खरोखरीची सुंदर ओंवाळणी घातलेली असल्यानें ते मराठी भाषाभिमान्यांच्या अभिनंदनास पात्र आहेत. अशीच उत्तरोत्तर त्यांच्या हातून साहित्याची सेवा घडो व सौ. सुशीलाबाईंचें लिखाण उत्तरोत्तर उच्च कोटीला पोहोंचो असें मनःपूर्वक इच्छून व आशीर्वाद देऊन मी हा पुस्तकपरिचय येथेंच पुरा करतों.

पुणें
२०।१०।५२

**सत्यबोध बाळकृष्ण हुदलीकर**

# पान उघडण्यापूर्वी—

राग व ताल यांचें ज्ञान असलेल्या मोठ्या लोकांनीं 'संगीतकें' प्रयोगरूपानें करून दाखविलीं. पण लहान लहान मुलांमुलींनीं, आपल्या शाळांच्या अगर चाळींच्या, लहान लहान उत्सवांतून समारंभांतून हीं छोटीशीं 'संगीतकें' करून प्रेक्षकांचें मन रिझवावें, एवढ्याकरतांच हें पुस्तक लिहिण्याचा मीं प्रयत्न केला आहे.

ह्या संग्रहांतील दोन संगीतकें 'बाहुलीचें लग्न' व 'ताईची फजिती' हीं प्रयोगरूपानीं मुलींनीं करून दाखविलीं होतीं. तीं फार परिणामकारकही झालीं आणि म्हणूनच कीं काय माझ्याकडे आणखी मागणी आली. तेव्हां अशा तऱ्हेचीं दहा-बारा तरी लिहून ठेवावीं असें मनांत येऊन मीं हीं संगीतकें लिहिलीं आहेत.

'बाहुलीचें लग्न' हे संगीतक मुंबईतील 'शारदामन्दिर' या शाळेंतील लहान मुलींनीं आपल्या शाळेच्या गणेशोत्सवांत करण्याकरतां माझ्याकडून मागून नेऊन त्याचा प्रयोग करून दाखविला होता व 'ताईची फजिती' हें संगीतक १९५१ सालीं 'हिंद-महिला समाजां'तील मुलींनीं प्रयोगरूपानें पुढें आणलें. त्यानंतर चार-पांच ठिकाणीं त्याचे प्रयोग झाले.

लहान मुलामुलींना आनंद वाटला कीं त्यांतच मोठ्यांचाही आनंद सांठवला जातो.

गेल्यावर्षी 'भाऊबीज' मालेच्या प्रथम पुष्पानें सुरवात झाली. ते पुष्प मोठ्या माणसानीं हुंगलें तर दुसरें पुष्प बाळगोपाळांसाठींच ओंवलें आहे.

त्यांच्या आनंदांतच यंदाची माझी भाऊबीज साजरी होईल.

'श्रीपंत भुवन'
मुंबई नं. ७
८ आक्टोबर ५२

सौ. सुशीला मराठे

# ओंवाळणी—

'भाऊबीज-माले'चे द्वितीय पुष्प रसिक वाचकांसमोर ठेवतांना मला अत्यंत आनंद होत आहे. गेले वर्षी 'मराठाचि बोल' या काव्यसंग्रहानें या मालेची सुरुवात केली व दरवर्षी भाऊ-बीजेच्या दिवशीं एक पुष्प ओंवावें असा संकल्प केला.

या मालेबद्दलची कल्पना मी 'मराठाचि बोल' या पुस्तकाच्या माझ्या निवेदनांत सांगितलीच होती. सोकर्यासाठीं द्विरुक्तीचा दोष पत्करूनही ती पुन: येथें सांगावीशी वाटते.

या मालेबद्दलची कल्पना साधारण अशी आहे की दरवर्षी दिवाळीचे सुमारास एक पुष्प प्रसिद्ध करून श्री शारदेच्या चरणी वाहावयाचें त्यांतील मुख्य अट अशी कीं जे लिखाण प्रसिद्ध करावयाचे ते फक्त स्त्री लेखिकेचेच असावयास पाहिजे.

"संगीतक" हा नवीन वाङ्मय-प्रकार लहान मुलांच्यासाठीं मुद्दाम निवडला आहे. प्रस्तुत पुस्तकांत एकंदर बारा संगीतकें आहेत. लहान मुला-मुलींमधील उपजत नाट्यगुणाला योग्य वाव देऊन त्या गुणाचा परिपोष करावयास या 'संगीतकां'ची चांगलीच मदत होईल.

बाल-मानस-शास्त्र व शिशुशिक्षण यांत तज्ञ असलेले पुण्याचे ख्यातनाम प्राध्यापक व 'बालक मंदिरा'चे चालक श्री. रा. रा. सत्यबोध बाळकृष्ण हुदलीकर यांनीं या 'संगीतका'ला प्रस्तावना लिहून उत्तेजन दिल्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

सदरहू पुस्तक अक्षरश: दहा दिवसांत अत्यंत सुबक व सुंदर सजावटीनें छापून दिल्याबद्दल 'स्वतिक' मुद्रणालयाचे चालक श्री.रायरीकर आणि त्यांचा कुशल व निरलस कामगारवर्ग यांचें जितके आभार मानावेत तितके थोडेच आहेत.

आंग्रेवाडी; मुंबई नं. ४
भाऊबीज, शके १८७४
(२० आक्टोबर १९५२)

पि. अ. वारपुरे

# अनुक्रमणिका—

## ताईची फजिती ☆ ☆ ☆ १

[ पात्रें:—ताई–नुकतेंच लग्न झालेली व दिवाळीकरतां माहेरी आलेली १८. १९ वर्षांची.

माई:–खटयाळ विनोदी स्वभावाची ताईची धाकटी बहीण ९ ते १० वर्षांची.

ताई सचिंत बसलेली असते.]

माई—(नाचत प्रवेश करून) रुसुं बाई रुसूं। डोळयांत आलं आसूं?
सणाचा दिवस, अन् हें ग काय?
जेवत नाहींस खात नाहींस, झालं तरी काय?
(काळजीच्या सुरांत) बोलली कां आई?

ताई—( चिडून ) नाहीं बाई नाहीं.

माई—मग काय झालं? रागावलं कां कुणी?
गुणांची खाणि माझी ताई रूपराणी!
[तिच्या तोंडाभोंवतीं ओंवाळून आपल्या कपाळाशी बोटे मोडून दृष्ट काढल्यासारखें करते. ]

ताई– ( रागानें) कशाला बडबड, जा तिकडे धडपड !
[ तिला हातानें लोटून देते ]

माई—( स्वतःशीच ) लागली कां दृष्ट ? कोण मेलं दुष्ट ?
काय बाई करूं ? कसं बाई करूं ?
इडा पिडा टळो अन् अमंगळ पळो।
केतकीचा रंग, रसरसलं अंग।
दंश करून गेला, कोण बाई भुजंग।
काळवंडली काया, सारा नूर गेला वाया।
(मोठ्यानें) ताई, ए ताई, हांस ना ग जरा, ही काय तऱ्हा?
[ तिचें तोंड वळवते. ]

ताई—असूं दे, असूं दे, तुला काय चिमुरडे।
ज्याचं जळतं। त्यालाच कळतं।
[ आपल्याशींच पण मोठ्याने ]
दिवाळीला येईन म्हणे दिवाळीला येईन।
चार दिवस झाले एकसुद्धां पत्र नाहीं।
पुरुषांचा स्वभाव, लागेल कां ठाव ?

माई—( हंसून ) ओ हो ! ओ हो ! म्हणून कां काळजी ?
येतील हो भाउजी, येतिल हो भाउजी !
[ निघून जाते ]

ताई—एकलंस कीं काय तूं ?
छे ! ग बाई, तें कांहिं खरं नाहिं
( मनाशीं ) उगाचच बोलले
( उघड ) बरं कां ग माई...अं ? गेलि कुठें बाई ?
दादाला सांगायला गेलि असेल ती।
चिडवून आणि रडवून करतिल माझी फजिती।
आई काय म्हणेल ?—
' आम्ही काय कोणी परकी कां झालों?
तिकडची ओढ, दिला माहेर अगोड !'
काय बाई करूं ?
कशाला मी बोलले ? मनांतले कढ बाहेर उफाळले।

बोलले तर बोलले, पण ऐकलंन् ना तिनं ?
आतां करतिल सारी मला बेजार थट्टेनं ।

माई—( प्रवेश करून ) ताई, ए ताई, माझ्या हातांत काय
तें ओळखशील कां बाई ?

ताई—एखादा लाडू...

माई—तुझं तोंड कां कडू ? ओळखशिल तर देईन
बोल, बोल, बोल, तुलाच त्याचं मोल ।
ओळखलंस तर देइन, नाहिं तर नाहीं
ही मी चालले, मग होशिल उत्सुक ।
अन् मारशिल हांक, अन् म्हणशिल काय
तें सांगूं कां तुला ?

ताई—मायडे, मायडे, आण बघूं इकडे ।

माई—देणार नाहिं मुळींच, बस मग उगीच ।

ताई—करंजीचा तुकडा....

माई—असा कां मुखडा ? बाई, बाई, बाई
अशि काय चिडचिड ? नकोच ना तुला ?
एका माणसाचं गुपित कळलंय आम्हाला ।
ऐकायचंय कां तुला ?

ताई—हो हो तर !

माई—मला काय देशील ? कानांतले डूल ?
परकराला खण ? अजून तरि 'होय' म्हण ।

ताई—होय, होय, होय ।तुझ्यापुढें माई बोलायची नाहीं सोय
हं, सांग काय तें, सारं कांहिं ऐकते ।

माई—हात नाहीं लावायचा, शब्द नाहीं बोलायचा।
आहे कां कबूल ?
दुरून बघायचं, अवळ नाहीं यायचं,
आहे कां कबूल ?

ताई—कबूल, कबूल, सारं कांहीं कबूल।
माई—होय ना? खरं ना? हे बघ हे बघ भाउजींचं पत्र।
[ ताई घेऊं लागते ]
हां, हां, हां, लांबून दुरून बघायचं केलंस ना कबूल?
ताई—( समजुतीच्या स्वरांत ) असं काय बरं? खुळी कां तूं?
दुसऱ्यांची पत्रं वाचुं नये आपण।
जा बघूं खेळायला, बोलावते आहे आई तुला।
माई—अं हं! अं हं! आम्ही नाहीं जा।
ताई—(रागावून) आतां मात्र फार झालं.
लहान नाहीं मोठं नाहीं
सगळ्यांची थट्टा!
शोभतं कां तुला? चल आण इकडे,
[ पत्र हिसकावून घेऊं लागतें ]
फारच चावट झालीस मायडे!
माई—( शरणागताच्या स्वरांत ) बरं बाई घे तुझंच तुला।
लखलाभ होऊं दे नकोच आम्हांला।
( पाकीट देते ) जातोच आम्ही ( जाऊं लागते )
[ तोपर्यंत ताई पाकीट पाहते व चिडते ]
ताई--अग अग हें काय? नुसतंच पाकिट?
कुठें आहे पत्र? अगदींच विचित्र!
अशि कशी वेंधळी, खुळी अन् बावळी
कुणी फोडलं पाकीट? बोलतेस कां बया?
मूर्ख महामाया! ( माईला गदागदा हलवते )
माई--मला कां शिव्या? दादानी फोडलंन्
मी म्हटलं-'दादा, नको रे बाबा, मला वाटते भिती,'
तर म्हणाला कसा, 'आपण करूं या ताईची फजिती'।

ताई--कुठें गेला दादिदूला ?

माई--स्टेशनवर गेला, भाउजींना आणायला
भाऊजींना आणायला, भाऊजींना आणायला
[ पुन्हां पुन्हां ' आणायला, आणायला ' म्हणत म्हणतच
आंत निघून जाते ]

ताई--( स्तिमित होते व लाजते ) ( आपल्याशीच )
असाच आहे दादा । पुरा झाला वायदा !!
[ सुटकेचा निःश्वास टाकते. ]



## बाहुलीचं लग्न ☆ ☆ ☆ २

[ लता व अलका ह्या दोन मैत्रिणी ६ ते ७ वयाच्या ]

लता-- अलका, ए अलका! माझ्या बाहुलीचं लग्न आहे बरं कां!

अलका--खरंच कां लता? पण नवऱ्यामुलाचा आहे कुठें पत्ता?

लता-- येशिल कां तूं? तुझा आहे ना बाहुला?
देशिल कां मला? पुण्याच्या मामांनीं आणलाय् ना तुला?

अलका--वा ऽ ग ऽ वा ऽ! तुला कां देऊं? माझा आहे तो।

लता-- अग, पण आम्ही अग्गत कां मागतो।
लग्नापुरता दे, मग देऊं परत।
आईची शप्पथ, देइन हो परत।
झालंच तर आणखी........
खोबऱ्याची खिरापत, चुरमुऱ्याचा भात
हलव्याचे लाडू, आणखिन्, आणखिन्.....

अलका--(नाक मुरडते) कांहीं नको कांहीं, मला नाहीं आवडत!

लता-- मग काय हवं?
बोल बाई एकदां। काय आहे वायदा।

अलका--काढशील कां वरात? तुझ्या दादाची मोटार।
हवी हो तयार। पण जेवायला काय ग?

लता-- सांगितलं ना मघाशी ? आतां नको घासाघिसी ।
बोल एकदां काय तें ।

अलका--बोलाचा भात अन् बोलाची कढी ।
करशिल कां बोल, तर जाइल आढी ।

लता-- म्हणजे ग काय ? बोलाचा भात, करतात तरि कसा ?

अलका--मला काय माहीत ? परवाच्या दिवशीं ।
मुंबईची मावशी । म्हणत होती कोणालाशी ।
नाहिंच ना माहित तुला ? अन् म्हणे निघाली
लगिन करायला । अहाहा! अहाहा!! काय पण वेडपट।
( दिवे ओवाळल्यासारखे हात करते व जीभ दाखविते. )

लता-- बंद कर वटवट । अलका, अलकटले
चिडवलंस तर बघ हं, गडी-फू करीन ।
आईला सांगेन ' वेडावी तो वेडावी,त्याची जीभ तोडावी '।

अलका--छान ! छान ! छान ! चिडलीस कीं काय तूं ?
थट्टा केलीं थोडी !

लता-- कांहीं नको लाडी गोडी ! बरं पण जाऊं दे ।
आहेस कां तयार ? म्हणशिल तें देइन
रंगिबेरंगि कागद । तुकडे नाहिं सबंध ।
चकचकीत चांदी । रुसूं नको अगदीं । बोल बाई जलदी ।
मोराची पिसं । आलं कीं अगदीं खुद्‌कन हसं ।
खडूचें तुकडे ? लौकर लौकर बोल गडे ।
नको आणूं विघ्न । ठरव हें लग्न ।

अलका--( तिच्या प्रत्येक वाक्याला मिटक्या मारीत )
कबूल,कबूल,हुंडा म्हणून आम्हाला चालेल हो सगळं ।
उद्यांच आहे रविवार । उडवून टाकूं बार ।
अन् बाहुलीला घेऊन तुझ्या होऊ आम्ही पसार !

लता— ( चिडून ) अडलंय माझं, डाव्या पायाचं ।
आतां फार झालं तुझं ।

अलका—( समजावणीच्या सुरांत ) असं काय करतेस ?
अशीच असते रीत । तुला नाहीं कां माहीत ?
पाठवायलाच हवी हो नवऱ्याच्या घरीं ।

लता— पण दोन दिवसांनीं नवरी,
येऊं दे हो माहेरी
( अलका मानेनेच ' होय ' म्हणते )
( मनाशींच ) मग कोण पाठवतंय
पुन्हां पुन्हां सासरी !!



## तिकडचं पत्र आलंय हो मला ! ✩ ३

रजनी—विद्या, ए विद्या, जाणार आहे मी उद्यां ।
ठाऊक आहे कां तुला ?
तिकडचं पत्र आलंय हो मला !

विद्या— इकडचं, तिकडचं ! म्हणजे ग काय समजायचं ?
शिकलिस सवरलीस, अन् अशि काय बोलतेस ?
म्हणे ' तिकडचं पत्र '–अगदींच विचित्र ।
शहाणी माझी रजनी, इतकी कशि अडाणी ?

रजनी—इश्श्य ! विद्ये ! मग काय म्हणायचं ?
नांवानीं कां बोलायचं ? मला नाहिं हो जमायचं !
मला वाटते लाज

विद्या—लाजेचं काय काज ?
सरळ सरळ नांवानी, हांक मारावी मोठ्यानी ।
काय पण आणतेस आजीबाईचा आव ।
मनांतल्या मनांत, हजार वेळां घेत असशिल नांव ।

रजनी—अनुभव कुठुन तुला, उगीच बोलतेस मला ।
बरं आहे, पाहूं या, वैशाख आलाय जवळ ।
मग होइल धांदल

लाजतां मुरकतां एका माणसाची होइल कशि गंमत।
बोलावशिल कां मला ?

विद्या —रजनी, रजनी, जिवाभावाच्या मैत्रिणी
विसरेन कां तुला ?
म्हणुन तर आले धांवत, सांगायला गंमत।
पण कसं बाई सांगूं ? ( लाजते )

रजनी—थांब थांब विद्ये, कांहीं नको बोलूं।
सारं तुझ्या मनांतलं, आपोआप समजलं।
बघ बघ कसं तें चेहेऱ्यावर उमटलं।
गालावर हांसू पण डोळयांत कां ग आंसू ?
हें ग काय ?
कुठेंतरी कांहीं तरी, खटकतं आहे बाई।
हा काय प्रकार, सांग बघूं चद्रकिनी।

विद्या –रजनी रजनी
विनयावर माझं...

रजनी--समजलं, समजलं !
नाहिं तरि 'विद्या' विनयानंच शोभते !
ठीकच झालं

विद्या --प ऽ ण, पण ......

रजनी--पण पण काय करतेस ?
लावलाहेस कीं काय पण ?
मत्स्यभेद कीं धनुर्भंग ?
बाकी विनय बांधिल चंग।
अन् पळविल हो तुला !

विद्या--नको नको रजनी,
गोड गोड थट्टा वांचते आहे मला !

रजनी—म्हणजे ग काय ?
लाजेचा कां प्रकार ? कीं प्रेमाचा विकार ?
प्रेमिकांची जात तुझी, आंत एक, बाहेर एक ।
अनुरूप आहांत एकमेक ।

विद्या—काय म्हणालीस ' जात ' ?
होय ग होय ! तीच करतेय् घात !
आई आणि बाबा, दोघांचाही तावा ।
ऐकत नाहीं कुणी, किती सांगितलं रजनी ।

रजनी—काय म्हणतात ती ?

विद्या—शिकला आहे, देखणा आहे, गोड गोड स्वभाव आहे
पण जात येते ना आडवी–

रजनी—अन् म्हणून तुझी कां सुरत झाली रडवी ?
नाहींतरी खरंच ।
आपल्याही जातींत थोडे कां आहेत मुलगे ?
त्याच्याच कां मागे मागे ?

विद्या—प्रेमाचं महत्त्व कांहींच कां नाहिं तुला ?
जन्मानं जात येते, यौवनानं प्रीति जडते ।
मनानी वरलं, जिवानी जिंकलं पण जातीनं हरवलं !
पण मी नाहीं हरणार, मी बंड पुकारणार ।

रजनी—बाई बाई विद्ये,
आईबापांविरुद्ध ? आहे कां शुद्ध ?

विद्या—मग काय करूं ?
प्रीतीचं पाणी खळखळ करतंय् ।
भावनेचा भुंगा गुणगुण करतोय् ।
उत्कंठेची ओढ पुढें पुढें ढकलतीय् ।
पण आशेचा अंकुर उन्मळुन पडतोय् ।
रजनी, रजनी वाखव ना ग वाट ।
पळुन जाण्याचा मार्ल्ू कां थाट ?

रजनी—छे ! छे ! विद्ये ! भलतंच्या सलतं ।
प्रेमाचं महत्त्व मलाही समजतं ।
विद्या-- मग करायचं काय गडे ?
खुपतात ग रजनी हे निराशेचे खडे
रजनी--होऊं नको उतावीळ ।
प्रेमबिम सारं, सारं कांहीं कबूल ।
पण केलास कां विचार ?
विनयच्या संगतींत होशिल कां तूं सुखी ?
पटेल कां तुझं ?
आधीचा प्रियकर मग होईल पती,
अन् नवरेपणाच्या जोरावर,
करिल तुझी फजिती !
मग बसशिल रडत,
पण लग्नाची गांठ, रेशमाची निरगांठ ।
सुटायची नाहीं मुळीच ।
त्यांतूनही सोडलीस तर अब्रु जाइल उगीच ।
नीट कर विचार, अन् मग बंड पुकार !
विद्या--केला आहे विचार ।
उथळ पाण्याची नाहीं बरं खळखळ ।
एकमेकांसाठीं खरी खरी तळमळ.
मनाचा निश्चय, विद्येचा विनय, भाग्याचा उदय
यांतच काय तें समज.
रजनी--छान ! छान ! छान ! ठरव हें लग्न
विद्या— अशि कशि बदललीस ?
तूंच कां ती रजनी ? अडाणी न् सनातनी ?
कुठें गेला जुना स्वभाव ?

रजनी--ऐकला ना।

तुझ्या तिकडचा स्वभाव
अन् प्रेमाचा प्रभाव ! ! !



रजनी—छे ! छे ! विद्ये ! भलतंच्या सलतं ।
प्रेमाचं महत्त्व मलाही समजतं ।
विद्या—मग करायचं काय गडे ?
खुपतात ग रजनी हे निराशेचे खडे
रजनी—होऊं नको उतावीळ ।
प्रेमबिम सारं, सारं कांहीं कबूल ।
पण केलास कां विचार ?
विनयच्या संगतींत होशिल कां तूं सुखी ?
पटेल कां तुझं ?
आधीचा प्रियकर मग होईल पती,
अन् नवरेपणाच्या जोरावर,
करिल तुझी फजिती !
मग बसशिल रडत,
पण लग्नाची गांठ, रेशमाची निरगांठ
सुटायची नाहीं मुळीच ।
त्यांतूनही सोडलीस तर अब्रु जाइल उगीच ।
नीट कर विचार, अन् मग बंड पुकार !
विद्या—केला आहे विचार ।
उथळ पाण्याची नाहीं बरं खळखळ ।
एकमेकांसाठीं खरी खरी तळमळ.
मनाचा निश्चय, विद्येचा विनय, भाग्याचा उदय ।
यांतच काय तें समज.
रजनी—छान ! छान ! छान ! ठरव हें लग्न
विद्या— अशि कशि बदललीस ?
तूंच कां ती रजनी ? अडाणी न् सनातनी ?
कुठें गेला जुना स्वभाव ?

रजनी--ऐकला ना।
तुझ्या तिकडचा स्वभाव
अन् प्रेमाचा प्रभाव !!!



*

## देवाघरचीं फुलं !    ४

मानवाचें बाळ [ बागेंत गुलाबाच्या झाडाजवळ जाऊन ]

—गुलाबाच्या कळी, हसून कां बसलीस ?
अन् पानाच्या आड, म्हणुन कां लपलीस ?
ताई नाहिं कां घरीं ? कुठें गेली ताई ?

गुलाबाची कळी—देवाच्या पूजेला गेलि माझि ताई !
पण – पण – येणार नाहिं पुन्हा !

मानवाचें बाळ—देवाकडे गेली ? खरंच कां बोल ना !
देवाचं घर केवढं ग असतं ?
कितितरी जण जातात ग तिथं ?
आमची पण आजी गेलि आहे तिथं
पण असं हें घर असतं तरी कुठं ?
निळ्या निळ्या आकाशांत ?
चांदोबाच्या प्रकाशांत ?....

गुलाबाची कळी—थांब, थांब, थांब.
मी पण जाणार आहें, मोठी झाल्यावर...
" फुलून निघेल तुझी पाकळीन् पाकळी
सुवासांत नाचशील, दिमाखांत शोभशील

डौलांत, पेटींत खुदुखुदु हंसशिल,
हंसतांना दिसशील उकललेलं अनार,
गुलाबी साडीला हिरवी हिरवी किनार,
कुणितरि येईल अन् मग तुला नेईल।
रमणीच्या शिरांवर, प्रभूच्या पदावर
भूषण म्हणून शोभशील तूं "—
—असं बोलली ताई.

मानवाचें बाळ—मजाच आहे तुझी . . . .
पण हा कोण इथं ? झेंडूचें बाळ !
नारिंगी शेला पांघरूनसा बसलास ?
थंडी कां वाजतेय् ?

झेंडूचें बाळ— नाहीं बाळ नाहीं.
आईनं सांगितलंय, जाऊं नको कुठं.
खोबऱ्याचा खाऊ दिला आहे मला
पांघरायला दिलान् तिचा नारिंगि शेला.

मानवाचें बाळ--कुठं गेली आई ?

झेंडूचें बाळ— माळिदादा आला अन् तिला घेऊन गेला.
दारावर लावायला हव्या होत्या माळा,
मावशी अन् आई, मामी अन् ताई
सगळ्याजणी गेल्या
मी अन् दादा राहिलोंय घरीं
तें सारं राहुं दे पण चाललास तूं कुठें ?

मानवाचें बाळ—मी ना ? सांगूं ?
बकुळीच्या बाळाशी बोलायला, खेळायला
हा बघ, हा बघ, सुंदरसा वास त्याचा, बोल-
वायला आला.
जातों हं मी,बकुळीचं बाळ आहे किती नामी!

[ जरा पुढें जाऊन बकुळीच्या फुलाला पाहून ]

बकुळीच्या बाळा, अगदींच कसा खुळा
एकटाचसा बसलास, कुणावर रुसलास ?

बकुळीचें फूल— काय करूं दादा ?
कालपासून मी असा,
पहातोंय तिची वाट,
दुडुदुडु धांवत येइल एक छोकरी।
नाचत, खेळत, जशि कांहीं भिंगरी।
अन् नेइल मग मला, हळुंवार हातानं
रुमालाच्या पालखींतनं;
गोड गोड गाणं, कोकिळ कंठांतनं गात
गात येते,
रोजरोज येते अन् भावंडांना माझ्या घरिं
घेऊन जाते !
काशि नाहीं आली आज ?
कुठं रे ती गेली ?
माहित आहे कां तुला ?

मानवाचें बाळ—हां ! हां ! हां ! ती आमची ताई.
येइल हो येइल, एवढ्यांतच येइल.
चल, चल, चल; तोंवर आपण खेळूं
हंसूं अन् बोलूं.
हं ! हं ! हं ! पैंजणांचा नाद।
घालतोंय मला साद;
धांवत, नाचत, आलीच बघ ताई...

[ एक लहान मुलगी धांवत येते ]

ताई, ए ताई, उशिर कां ग झाला ?
तहान लागलिय ना तुझी,
या बकुळीच्या बाळाला !

[ बकुळीचें फूल टवटवीत दिसतें ]

बघ कसं हसलं. उचल ना त्याला !
नाजुकशा रुमालांत संभाळ हो त्याला !

ताई— (उदासपणें) नको बाळ नको, सांगतें मी खरंच !
राहुं दे त्याला हंसत खेळत इथंच !
मी नाहीं नेणार. घरीं नेलं तर . . .
( एकदम रडूं लागते. )

मानवाचें बाळ—अग, अग ताई, झालं तरि काय तुला ?
बोलली कां आई ? बोल ना ग ताई !

ताई— नाहींतर काय ? ' आइट्ली खापट्ली

मानवाचें बाळ—ई हं ताई,
आईला आपल्या असं कां म्हणायचं ?

ताई — मग काय करायचं ?
मारलंनूना मला उगाचच मघाशी ।
बोलली तिला मावशी !

मानवाचें बाळ—काय म्हणाली मावशी ?
सांग ताई चट्दिशी ?

ताई— सांगूं कां तुला काय म्हणाली मावशी !
म्हणे ' गोजिरिं गोजिरिं मुलं
जणुं देवाघरचीं फुलं !
अशीं कां कुस्करतात ? '

मानवाचें बाळ—मग ग ताई, काय म्हणाली आई ?

ताई— आई म्हणाली तिला
, मुलं नाहित तुला म्हणून असं बोलतेस ।
हीं कसलीं फुलं ?
सकाळ संध्याकाळ. त्या बागेत हुदडा ।
एकसारखे निरोप

जेवायची शुद्ध नाहीं,
तहान नाहीं, भूक नाहीं,
चालली तिकडे नाचायला,
कांहीं नाहीं जायचं !'

ताई— मी म्हटलं ' आई,
तूं कांहीं केलंस तरी, जाणारच मी तिथं,
फुलांच्या संगतीत राहिन मी मजेत !

मानवाचें बाळ--म्हणून कां मारलंन् ?
थांब हं जरा आपण करूं गंमत.
थोडा वेळ आणखी थांबूं या इथंच
मग कशि होईल । आईची घांदल ।

ताई-- हां रे हां ! छान सुचविलीस मजा ।
अश्शीच हवी आमच्या आईला सजा ।
चल चल लप । बस अगदीं गुपचुप ।
आलीच बघ आई । बोलायचं नाहीं ।
हं हंसायचं नाहीं. आतां एका माणसाची
छान होईल गंमत !

[ दोघे लपतात ]

आई-- ( आई येते ) बाई बाई बाई गेलीं कुठें मुलं ?
ताई आमची म्हणते ' देवाघरचीं फुलं ' !
कुठें आतां शोधूं ? कोणाला विचारूं ?
हं हं हं हीं आहेत ना इथं सुंदरशीं फुलं !
( जवळ जाते ) गुलाबाच्या फुला ।
पाहिलंस कां बाळाला ?
तुळशीच्या मंजिरी । पाहिलींस कां कुठें
आमच्या बाळाची स्वारी ?
झेंडूच्या फुला । पाहिलंस कां कुठें
आमच्या बाळाला नू ताईला ?

गुलाबाच्या कळी ! माहित आहे कां तुला
आमची ताई वेडी खुळी ?
काय बाई करूं ? कुणाला विचारूं ?
सोन्यासारखीं बाळं माझीं । जणुं फुलं ताजीं
कधिं मला भेटतील ? कशि कुठं दिसतील ?
मारूं कां हांक ? कशाला लावला मीं धाक ?
गेलीं ना पळून, ताई माझी रुसून,
ताई ग ताई,
आतां नाहीं हं रागावणार,
मुळी नाहीं मारणार. ये ना ग लवकर.
ताई ए ताई, वाट पाहतेय आई
जीव झाला गोळा कासाविस झाले प्राण ।
आतां तरी बाळांनो लवकर या धांवून ।
[ मुलें धांवत येतात व आईला भेटतात.
ती त्यांना मिठी मारते व पापे घेते.]

आई--कशीं हीं मुलं--' देवाघरचीं फुलं ' ।



# लागेल ना नजर !    ५

[ शकू:—७ ते ८ वर्षांची मुलगी आपल्या बाहुलीला मांडीवर घेऊन झोंपवत आहे व थोड्याच वेळांत तिला झोंप लागली आहे असं पाहून एका बाजूला तिनें तिला अंथरुण घालून झोंपवलें पण तेवढ्यांत तेथें एक चिमणी येते तिला .... ]

शकू— आलीस ना चिउताई
दाणे टिपायला इथें ? ।
दिसत नाहीं कां तुला
माझी बाहुली झोपली आहे तें ? ।
आलीस तशी जा, पण
वाजवूं नको पंख
मोडेल ना झोंप
संध्याकाळीं ये मग
करू आपण मजा ।
पण आत्तां तेवढी जा ।
होऊं नको दुष्ट । पण चिउताई
तुझीसुद्धां लागेल हो दृष्ट !

( चिमणी उडून जाते )

[ तेवढ्यांत तेथें आलेल्या कावळ्यास ]

आलास कशाला अवेळीं ।
माझी पहायला बाहुली ?
वांकडी वांकडी मान करून,
तिरप्या एका डोळयानं,
बघतोस रे काय मेल्या ?
हं हं हं, जाऊं नको जवळ
जा तिकडे पळ
लावशील तिला चोंच
अन् लागेल कीं, बोंच
' काव, काव, काव, ' असा
करूं नको गजर ।
जा इथून निघून, नाहितर
लागेल ना नजर ! !
कावळा गेल्यानंतर पलीकडून कुत्रा भुंकत येतां ]
भूः भूः भूः आलास ना भुंकत ?
जा बैस दारांत
समजत नाहीं कां तुला ?
छकुलीचा माझ्या, जरा लागलाय हो डोळा ।
तुझ्यावांचून खोळंबा । नाहीं झाला बाबा ।
भूभूभूचा करूं नको ओरडा
हवा तर देते तुला भाकरीचा तुकडा
हातपाय चाटशील, लाडांत येशील
पण सांगून ठेवतें मोत्या तुला
पाठीवरून हात तुझ्या आतां नाहीं फिरवणार
आतां नाहीं गोंजारणार
लाडीगोडी नको आपली,
निजली आहे ना भाउली
करूं नको मत्सर
पण तुझी सुद्धां वेळेला लागायची हो नजर !

[ कुत्रा निघून जातो तेवढ्यांत मांजर येतं ]
आलांत कां बोकोबा
दूध पिऊन लबालबा ?
दबकत दबकत
लांब लांब मिशा चाटत
आलांत तस्से जा ।
घ्या आतां रजा ।
शूक् शूक् शूक् जाऊं नका तिकडे ।
सोनुलीला माझ्या ओरबाडाल गडे ।
अन् फाडून टाकाल तिचे सुंदरसे कपडे ।
घाऱ्या तुमच्या डोळयांची
मला वाटते भिती
नका पाहूं तिच्याकडे
व्हा जरा पलीकडे
नाहींतर बोकोबा
पहाता पहाता बाहुली माझी
अंग टाकील गडे
नको त्या वेळीं झालांत ना हजर ?
बोकोबा तुमची लागेल ना नजर !
[ मांजर गेल्यावर तिकडे पोपटांचा आवाज ]
कोण बोललं तिकडे ।
विठुमिय्या जरासा गप्प बस गडे ।
आला की कोप ।
पण छकुलीला माझ्या जरा लागली आहे झोंप !
फुटला कां कंठ आत्तांच तुला ।
नको करूं गलबला ।
गप्प बस थोडा वेळ ।
उठायची आतां झालीच आहे हो वेळ ।
लागलास पुन्हां बोलायला ।
नको तेव्हां बोलशील, वटवट करशील !

नवीन नवीन शब्द
नाहींच शिकवणार तुला।
त्रास देतोस मला।
समजलं कां विठू ?
जरासा थांब तूं।
ऐक एक गोष्ट।
तुझी सुद्धा पोपटदादा लागेल हो दृष्ट !
[ पोपट गेल्यावर आई येते ]
आई, आई ये
हळूंहळूं ये
वाजेल हो पाऊल।
अन् लागेल तिला चाहूल।
होईल ना झोपमोड।
अन् मग करील गडबड।
बघ बघ आई आतां
झालीच कीं जागी।
आतां कशी करूं उगी ?
लागलीच कीं रडायला।
लागली कां नजर माझ्या गुणाच्या बाळीला।
आण बाई आई मोहऱ्या आणि मीठ।
मग होइल सारं, सारं कांहीं नीट !

☆ ☆ ☆

## वाजव ना बांसरी ! ☆ ☆ ☆ ६

राधा—वाजव ना हरि। तुझी मंजुळशी बांसरी।
किती करूं विनवणी ?
नाहींच कां मी तुझी कुणी ?
रागावलास कां माझ्यावर ?
रुसलास तुझ्या राधेवर ?

कृष्ण—बोललीस ना पुन्हां ?
राधेवर माझ्या कधी रागावतो कां कान्हा ?
तुझ्यावर रुसूं ? मग कोणाशी ग हंसूं ?
राधेचा कृष्ण, कृष्णाची राधा
दोन आहोत कां सांग बरं।
एकाच आत्म्याची दोन आहेत शरीरं।

राधा—किती तरी वेळां ऐकलं आहे हें मी।
पण म्हणून कन्हैया, फसणार नाहीं मी।
बोलून, बोलून, करतोस तूं गुंग।
कुंजवनांत पळायचा दिसतो आहे रंग।
हसतो आहेस नुसता !
बोलूं नकोस माझ्याशी—निर्दय आहेस हृषीकेशी !
गोपींच्या विचारांत झाला आहेस दंग।
समजतात हो मला सगळी तुझी सोंग।

कृष्ण—भित्री आहेस तूं—आला ना किंतू ?
बोलूं नको म्हणतेस पण बोलायला लावतेस ।

राधा—मग वाजव ना मुरली ।
पुन्हां पुन्हां विनवायला
शक्ति नाहिं हो उरली ।

कृष्ण—मी नाहिं वाजवणार
नको ती बांसरी ।
वेड लावणारी ।
शुद्ध हरपविणारी ।
भान विसरविणारी
मन गुंगविणारी ।
नको ग राधे सांगुस वाजवायला ।
मुरलि ऐकतां ऐकतां, इथेंच तूं रमतेस
अन् घरीं गेल्यावर, बोलणीं बसतात तुला ।

राधा—बसूं देत, बसूं देत ।
झाली आहे मला संवय ।
पण होऊं नको तूं निर्दय ।

कृष्ण—बरं बाई वाजवतों,
पण ऐकशील माझी मुरली ।
अन् पळून जाशील आपली ।
तें नाहिं मला चालणार ।
मी मग अडवणार ।

राधा—अडवूं नको मुकुंदा ।
दुसऱ्याला छळण्याचा
एकच तुझा धंदा ।
आतां, वाजव ना जरा ।
जीव झाला घाबरा ।
ही काय रे तऱ्हा ?

किती करूं विनवण्या ?
ओलावल्या पापण्या ।
दांताच्या झाल्या कण्या ।
तुझ्या मुरलीचा सूर ।
अमृताचा पूर ।
अमृताचं पान करूं दे ना मला ।
कांठोकांठ भरूं दे सुखाचा पेला ।
अन् मुरली ऐकतां ऐकतांच
मरण येवो मला ।

कृष्ण--नको ग राधे, अशी केविलवाणी बोलूं ।
वाजवतों मुरली-मग हंसू अन् डोलूं
मग तर झालं ना?
इकडे बघ, इकडे बघ, तुझाच ना कान्हा ?
[ कृष्ण मुरली वाजवतो, राधा गुंग होते ]

ऊठ, ऊठ राधे,
तुला जायचं आहे ना घरीं ?

राधा—कुठं आहे मी ? कुठं गेला कान्हा ?
कृष्ण--हा बघ तुझा तान्हा ।
राधे, राधा, तूंच माझी यशोदा ।
मी तुझें लेकरूं ।
तूंच माझा गुरू ।
आलीस कां भानावर ?
जातेस ना आतां ?

राधा--जिवाचं झालं समाधान ।
आतां करतें प्रयाण ।
पण सांगून ठेवतें तुला
खेळायच्या नादांत ।
यमुनेच्या डोहांत ।

जाऊं नको मुरारी
नाहितर नाहितर
लहरी, जहरी कालिया
करील तुझा घात।
कंसाचे दूत, फिरताहेत सगळीकडे।
जपूनच खेळ गडे।
जाऊं ना कृष्णा ?

कृष्ण—पुरवली ना तृष्णा
आतां करूं नको काळजी।
उगाचच माझी।
बरं पण राधा।
मथुरेचा पेढा।
हवाय् कां तुला ?
सकाळपासून अगदीं
जपून ठेवलाय् मीं।
खाऊन तर बघ
आहे किती नामी।
झालं ना तोंड गोड ?
पुरवलं ना कोड ?
जातेस ना आतां
[ राधा 'नाहीं' म्हणते ]
होऊं नको वेडि खुळी।
पण येशिल ना उद्यां
ऐकायला मुरली ?



*

[ दासी—रोहिणी शोधीत शोधीत येते ]

दासी-- कुमार कुमार।
चपळ आहेत फार।
कुठं बाई शोधायचं ?
आतां काय करायचं ?
महालांत नाहींत, बागेत नाहींत
कारंजावर तर मी आत्तां शोधून आले।
कुठं बाई गेले ?
( पडद्यात पहात ) ओहो ! ओहो ! आलचि कीं स्वारी ?
पण चेहऱ्यावर आज लालि दिसतेय भारी।
रागावले कीं काय ?
मनमोकळा स्वभाव, रूपाचं वैभव, गुणांचा गौरव
करावं तेवढं
कौतुक होइल थोडं।
बोलतात किती लाडं लाडं।
आलेच हे इथे
राजकुमार, राजकुमार, होतात तरि कुठं ?

[ ध्रुव येतो, चिडून ]

ध्रुव— काय म्हटलंस ? राजकुमार ?
तूंच असशील राजकुमार
आम्ही नाहीं कुठल्या राजाचे कुमार !

रोहिणी-- इश्श्य कुमार, थट्टेला कांहीं सुमार !
हा कसला खेळ ?
अन् त्यांतून ही असली कातरवेळ !
नका हो असलं बोलूं ।
चला जरा बागेंत आपण हसूं अन् खेळूं

ध्रुव— कांहीं नको बाग ।
माझ्या हृदयाला लागलीय् आग ।

रोहिणी— झालं तरि काय तुम्हांला ?
एवढे कां रुष्ट ?
कोण्या मेल्या दुष्टाची लागली बाई दृष्ट ।
चला चला राजकुमार, आईकडे चला ।
पांघरायला घ्या तिथं मायेचा शेला ।

ध्रुव— शेलकासा आहेर मिळालाय् मला ।
आईलाच सांगायला चाललों होतों मी ।
नाहीं ग आतां राजकुमार मी ।

रोहिणी— वा ! वा ! वा ! हा न्याय खासा ।
कुणी मला हंसा ।
म्हणणारच मी तुम्हांला
राजकुमार, राजकुमार
तुम्हांला नाहीं म्हणायचं
मग हो कुणाला ?

ध्रुव-- आतां फक्त उत्तमाला ।
सुरुचिदेवींच्या लाडक्या त्या लेकाला ।
इकडे कर कान ।
( कानांत सांगतो ) सुनीतिदेवींना नाहीं आतां मान !

नांव काढतांच कशी
आली माझी आई।
स्नेहानं भरलेली मायेची समई !
[ सुनीतिदेवी—ध्रुवाची आई येते. ]
आई ग ऽ आई ग। ( मुसमुसतो )

सुनीति— काय बाळा, सांग।
काय आहे ग रोहिणी ?
बाळाला माझ्या, बोललं की काय कुणी ?

रोहिणी— काय जण बाई, पण मघापासून म्हणताहेत,
'राजकुमार, राजकुमार म्हणू नका कोणी'

ध्रुव— नाहीं ना ग आई आतां
उरलों मी राजकुमार।

सुनीति-- असं काय ध्रुवबाळा।
सांग पाहूं सारं मला।

ध्रुव— आई ग आई ग मी आणि उत्तम।
बाबांच्या मांडीवर बसलो होतो प्रथम।
बाबांनीं दोघांना मांडीवर खेळवलं।
कौतुकानं हंसवलं। हृदयाशीं धरलं।
पण देवींना नाहिं तें मुळींच बघवलं।

रोहिणी-- म्हणजे हो काय ? काय केलं त्यांनीं ?
सावत्र आईनं केली असेल करणी !

सुनीति— गप्प बस ग रोहिणी !
( ध्रुवास ) मग काय झालं ?

ध्रुव-- त्यांनीं मला लाथाडलं।
मांडीवरून उठवलं।
अन् म्हणाल्या कशा
मांडीवर बसायचा तुला नाहीं हक्क।
असं म्हणून त्यांनीं मला घालवून दिलं चक्क।

मी नाहीं आतां जाणार तिथें ।
होइल नाहितर एखादवेळीं भलतेंच्या सलतें ।
आई ए आई, विचारूं कां तुला ।
अशी एखादी जागा सांग ना ग मला ।
कीं जिथून मला कुणी उठवणार नाहीं ।
ढकलणार नाहीं, लाथाडणार नाहीं ।
राज्याच्या बाहेर, जगाच्या पाठीवर
कुठं आहे अशी जागा ?

सुनीति— करूं नको त्रागा !
परमेश्वरच आतां उरला पाठिराखा ।
जोड पाहूं हात ।
अन् आळव त्याला मनांत ।
जा त्याला शरण ।
धर त्याचे चरण ।
होईल हो प्रसन्न ।
माग मग ठिकाण ।
सुखाचं सदन,
जेथून तुला कुणी कधीं नाहीं उठवणार !
बरं पण जाऊं दे
झोपायचं हं आतां ।
झालं, गेलं, गंगेला मिळालं ।
विचार नाहीं करायचा ।
प्रश्न नाहीं विचारायचा ।
विसरून जा सारा मघाचा प्रसंग ।
आहे ना विश्वास माझ्यावर अभंग ।

ध्रुव— समजूत झाली माझी ।
आई, करूं नको काळजी ।
चल आपण झोपूं.

[ सुनीति त्याला थोपटून निजवते व स्वत:ही निजते ]

[ बऱ्याच वेळानें मध्येंच जागा होतो. ]

( स्वप्नांतच—) **नका हो देवी**

**अशा मला मारूं । मी तरि काय करूं ?**

**बाबांचा ळळा । किती आहे मला !**

**तोडून कां टाकू मी**

**त्यांच्या ह्या मायेला ?**

( आईकडे पहातो ) **आणि माझ्या आईला !**

(जागेपणीं) **कसा सोडून जाऊं या मायेच्या माउलीला !**

**पण अढळ असं स्थान हवंय् ना मला !**

[ हळू हळू चोरपावलांनीं जातो ]



# चन्द्राराणी    ८

[ रुसलेली रोहिणी व तिच्या मैत्रिणी ]

१ ली तारका— अग ए, रोहिणी ?
अग अग चन्द्राराणी !
असि कां ही खिन्न ?

२ री तारका— असेल कशी प्रसन्न ?
अजून नाहीं आली
तिकडची स्वारी ।
म्हणून झाली आहे तब्येत
गरमागरम भारी ।
म्लान झाला चेहरा ।
विस्कटला नखरा ।

३ री तारका— आठवलं ग मला
चतुर्थी ना आज ।
ढगड्यांत कसे रोहिणी
येतील ग महाराज ?

रोहिणी— आज एक चतुर्थी ।
पण नेहमीचंच आहे हें

एक दिवस लवकर यायचं
दुसऱ्या दिवशीं उशीर !

१ ली तारका-- किती बाई चिडतेस ?

२ री तारका— धुसफुसत बसतेस ।

३ री तारका-- अग अग सख्यांनो
मघाची गंमत सांगू कां तुम्हाला ?
हिचं चढलं मस्तक ।
जाता जाईना वेळ
म्हणून वाचायला दिलं पुस्तक ।
तर दिलंन् कीं फेंकून ।
उल्कारूपानें ।
पृथ्वीवर पडलं तें

१ ली तारका-- खरंच ग खरंच
राहिलं कीं सांगायचं ।
पौर्णिमेच्या दिवशीं
लागलं आहे नाटक ।
चंद्रमहाराज त्यांत
आहेत मुख्यच नायक ।

२ री तारका--अगबाई खरंच कां
नांव तरी काय ग ?

१ ली तारका - - चन्द्रग्रहण

रोहिणी-- काय म्हटलंस पाणिग्रहण ?
कोण करणार कुणाचं ?

३ री तारका— डोकं आहे कां ठिकाणावर ?
पाणिग्रहण नाहीं चंद्रग्रहण।
इतकी कशी मत्सरी तूं
नको तिथें किन् ।

भारीच बाई उतावीळ
थांब तरी अंमळ ।
बरं पण काय ग
खलनायकाचं काम करणार आहे कोण ?

१ ली तारका-- राहू नाहीं तर केतू
दुसरं कोण करणार ?

२ री तारका-- नाहीं तर काय
महाराजांचं सौंदर्य बघवत नाहीं त्यांना ।
खाऊ कीं गिळूं असं होतं त्यांना ।

रोहिणी— अगबाई तेंच कां
गेल्यावर्षी झालेलं ।
ग्रहणाचं नाटक
यंदाही लावलंय् ?
मला नाहीं आवडत ।
पण करायचं काय बाई
स्वारीला चालतं ।

१ ली तारका-- रोहिणी रोहिणी
इतकी कशी अडाणी ।
नाटक तें ।

२ री तारका-- तुला तें चालतं
तूं कां आहेस चंद्राची राणी ?
रुसकी रोहिणी ?

३ री तारका-- पुरे झालं ग आतां
एकसारखी थट्टा करूं नका कुणी ।

[ रोहिणी त्यांच्या नकळत निघून जाते ]

१ ली तारका-- बरं कां ग चन्द्राराणी ।
अं ? गेलि कुठं चटकिनी

२ री तारका-- जाणार कुठं दुसरीकडे ?
पहा ना तिकडे ।
दिशा उजळल्या
महाराजांची स्वारी आलीच कीं इकडे ।

३ री तारका-- मग राजाच्या राणीला
जायाला नको कां गडे ?
चला आपण आतां
जाऊं या तिकडे !



# भाऊबीज    १

[ पहांटेची वेळ भाऊ झोंपला आहे. विजया नटून थटून तेथें येते व त्याला उठवूं लागते. तिचें वय ८ ते ९ वर्षे व भाऊचें वय १० वर्षे ]

विजया-- ( त्याला हलवून ) **ऊठ ना रे भाऊ,**
**भाऊ ए भाऊ, किती हांका मारूं ।**
**अजून नाहीं कां उठायचं ?**
**किती वेळ झोंपायचं ?**
( आर्जवून ) **ऊठ कीं रे लवकर ।**
**अन् आटप सारं भराभर ।**
**मी नाहीं कां उठले ?**

भाऊ-- ( चिडून ) **हें काय ग विजटूले**
**मी नाहीं जा उठत ।**
**पहांटेचा घडपडत ।**
**मोडली ना माझी झोंप ।।**

विजया— **ओऽहो ! ओऽहो ! काय पण आला कोप ।**
**हे रे काय भाऊ, तुला भूपाळी कां गाऊं ।**
( सुरांत म्हणते ) **' घन:श्याम सुंदरा ऽ ऽ ऽ ।'**

भाऊ— पुरे पुरे बंद करा, काय पण आवाज ।

विजया— अरे भाऊबीज ना आज !
असा काय चिडवतोस ?
रागावतोस काय, रडवतोस काय
नको करूं जळफळाट ।
तुझ्याकरतां केव्हांपासून मांडून ठेवलाय पाट ।
पाटाभोंवतीं रांगोळी, समईसुद्धां लावली ।
वासाचं तेल, सुवासिक उटणं ।
पण अजुन कांहीं होत नाहीं भाऊ तुझं उठणं ।

भाऊ— बरं बाई उठतों ( डोळे चोळतो )
कशाकरतां एवढी भावाची सरबराई ।
समजलों हं ताई ।
हवी ना मोठ्ठी ओंवाळणी ।
म्हणून हीं गोड बोलणीं ।
एका माणसाच्या तोंडाला सुटलंय पाणी ।
कळतय् आम्हाला,
नाहींतर रोज रोज एकसारखी तर भांडतस

विजया— बरं भाऊराया, तें नाहीं हं आज
आज आहे सण, करायचं नाहीं भांडण ।
भाऊ आतां ऊठ, बस बघूं नीट
झालास ना जागा ।
आतां करूं नको त्रागा ।
चल बाबा घरांत आतां ।

आई— ( प्रवेश करते ) इतका वेळ रे काय करतां ?
अनू हें काय बरं भाऊ, ऊठ बरं लवकर ।
बहिणीचा जीव झालाय् वघ खालींवर ।
बहिणभावाचं प्रेम, अमृताहून उत्तम ।
जगींच अनुपम ।

जा बघूं आंत बाळ ।
विजू घालील आंघोळ । मग या इथ
जा जा लवकर ।
आटपून घ्या झरझर ।

विजया— ( भाऊला ओढीत नेते ) चल ना रे भाऊ ।
आंघोळीच्या वेळीं आपण फुलबाज्या लावूं ।

[ दोघे जातात ]

[ विजयाची मैत्रीण दुसऱ्या बाजूनें येत जराशी हिरमुसलेली, रडलेली अशीच दिसते ]

दया-- कुठं आहे विजया ?

आई-- पण हें ग काय दया ?
तुझ्या डोळ्यांत पाणी ?
सणाच्या दिवशीं रडतं कां कुणी ?

दया— सण ?-होय ! भाऊबीजेचा सण ।
विजूच्या आई, भाऊ हवा ना पण ।
मला कुठाय् भाऊ ?

आई-- आमचा आहे ना भाऊ ।
सख्खा नाहीं तर नाहीं,
त्यालाच समज भाऊ ।
ओंवाळ हो त्याला ।
जशि मला विजया, तशीच तूं दया ।
रडूं नको बाळ, भाऊला ओंवाळ ।
तुझ्या भावाला ओंवाळ ।

दया-- कित्ती हो तुम्ही चांगल्या चांगल्या आहांत ।
नाहीं तर आमच्या माई ।

आई-- बोलूं नये असं कांहीं ।
सावत्र असली तरी ती सुद्धां आई ।
बरं पण जाऊं दे ।
ये अशी पुढं ।

[ विजया व भाऊ येतात. भाऊनें आंघोळ केलेली आहे. नवे कपडे घालून आला आहे. दोघेही आनंदांत आहेत ]

ये इकडे विजया, ही बघ आलीय् दया।
दोघीजणी आतां भाऊला ओंवाळा।
हं हं विजये, इथं ठेव पाट।
अन् तूं वाढ दये ह्या ताटांत लाडू शेव।
काढा हं रांगोळी अन् ओंवाळा मग आळीपाळी।
बसा हो भाऊराया पाटावर ऐटींत।

भाऊ-- ( पाटावर बसतो ) हं हं विजू
आतां मला ओंवाळ।

विजया-- पण कर कीं आधीं फरा ।

[ तो ताटांतलें थोडेसें खातो व पाणी पितो ]

विजया-- ( आईला एकीकडे ) अग, पण आई,
दयेला कसली घालायची ओंवाळणी ?
माझ्याकरतां आणलीस तूं मोत्याची एकदाणी।
पण तिला काय द्यायचं ?
ऐनवेळीं काय करायचं ?

आई-- पाहतें हं मी,
कांहीं तरी करतें, आतां मी येतें।
तोंवर तूं ओंवाळून घे।
( आई घाईघाईनें आंत जाते )

[ विजया भाऊला ओंवाळते. तो तिला ठरलेली ओंवाळणी घालण्याकरतां खिशांतून रंगीत कागदांत गुंडाळलेली एकदाणी काढणार इतक्यांत आई प्रवेश करते. ]

आई-- विसरलेंच कीं मी, भाऊ ओंवाळलंन् कां विजूनं।
घाल ही ओंवाळणी।

[ त्याच्या हातांत एक बनारसी खण देते तो तिच्या तबकांत ठेवतो ]

आई-- हं आतां दया, ओंवाळ ना तूं ।

दया-- पण . . . परंतु

आई— इश्श्य दया वेडी कां तूं ।
हो ना आतां पुढें ।
असे कां आढेवेढे ?
कांहीं नको वाटूं देऊं ।
मानलास ना त्याला भाऊ ?
ईश्वराच्या कृपेनं
आम्हांला नाहीं कमी ।

दया-- खरंच कां ओवाळूं मी ? ।

आई— खरंच तर काय ? थट्टा कां करतेय् ।
अगदींच खुळी, वेडी अन् भोळी ।
हं घे तें तबक आतां, डोक्यावर टाक अक्षता ।
कपाळाला लाव त्याच्या कुंकवाचा टिळा ।
निरांजन सांभाळ, अन् हळूहळूं ओंवाळ ।
[ दया त्याप्रमाणें भाऊला ओंवाळते. आई त्याच्या हातांत दुसरा तसलाच बनारसी खण देते ]

आई— दे तिला भाऊ,
आजपासून दया झालीय् हो बहीण ।
[ दया तबक खालीं ठेवते व स्वस्थ उभी राहते ]

आई— अग दया उभी कां ?
उचल ना ओंवाळणी ।
म्हणणार नाहीं कांहीं कुणी ।
मिळाला ना भाऊ, आतां संकोच नको करूं ।
हांस बघूं मोकळेपणीं ।
आतां नाहीं ना भाऊबीजेला डोळयांत येणार पाणी ?

[ दया नाहीं म्हणून मान डोलावते व दोघी मैत्रिणी एकमेकींशीं बोलण्यांत दंग होतात. ]

आई— दया अन् विजया,
आतां शिवुंया सारखें, परकर आणि पोलकें।
मग कशा दिसाल ?
आवळ्या-जावळ्या बहिणी।
झाली ना ओंवाळणी

दया— नमस्कार करतें आई।
[ ती नमस्कार करते ]

आई— औक्षवंत हो बाई।
[ त्या तिघीही हंसत खेळत जातात. ]
बिचारी दया, नाहीं तिला भाऊराया।
म्हणून आली धांवत, मुसमुसत, खुसखुसत।
पण सांपडली तिला आज भावाची माया।
कृष्णाची द्रौपदी,
तशीच आहे अगदीं बिचारी दया।
[ आंत जाते. ]

☆ ☆ ☆

# सणांचें संमेलन  १०

[ किशोर-वय वर्षे ९ ते १०. संध्याकाळची वेळ. तो मराठी महिन्यांचीं नांवें, ऋतूंचीं नांवें, हिंदूंचे सणवार वगैरे पाठ करीत असतो. जरासा पेंगुळतो. त्याचा अर्धवट डोळा लागतो. तो तसाच खुर्चीला टेकून बसतो. इतक्यांत आंतून एक मुलगा व एक मुलगी येतात. मुलाच्या हातांत एक काठी, रेशमी खणाची घडी, एक साखरेची गाठी, फुलांचा हार त्या काठीच्या टोकाला बांधून ठेवलेले असतात व त्यावर एक चांदीचा गडू उपडा अडकवलेला असतो. गुढी घेऊन तो येतो व मुलगी डोक्याला फुलांचा मुकुट, गळ्यांत फुलांचा हार, हातांत फुलांचे गजरे वगैरे घालून सुंदर साडी नेसलेली अशी येते. किशोर जरासा जागा होतो. ]

**किशोर—** कोण आहांत रे तुम्ही ?
अभ्यास करतोंय मी !
त्रास द्यायला मला
आलांत रे कशाला ?

**मुलगा—** वाचलंस ना आत्तां ?
वाचतां वाचतां झालास आडवा ।
मला म्हणतात बाळ चैत्रांतला पाडवा ।
गुढीचा पाडवा ।
समजलं कां तुला ?

किशोर— खरंच की थट्टा ?
मुलगा— वा रे पट्टा !
वघ ना ही गुढी ।
वर खणाची घडी ।
साखरेची गाठी, फुलांचा हार, चांदीचा गडू ।
उंच उंच होऊन आम्ही गगनाला भिडूं ।
असा आहे मी ।
किशोर— फारच गड्या नामी ।
तुझ्याकरतां आम्हांला, सुटि मिळते शाळेला ।
गोडधोड खायला, नवे कपडे ल्यायला ।
मिळतात रे आम्हांला,
पण ही कोण रे बरोबर ?
मुलगा— अरे ही वसन्त गौर ।
पाहिलंस कशी नटलीय् !
मोगऱ्याचा वास ।
हिचा धुंद करितो श्वास
किशोर— माहित आहे रे मला ।
हिला आवडतं म्हणून गायन करिते कोकिला ।
मुलगी— हळदीकुंकू वासंतिक करते ना आई ?
अत्तर नि गुलाब, फुलं नि खिरापत
वाटते ना ताई ?
काकडीचे खिरे, ओटींत घालते हरभरे ।
पन्हं करते आंब्याचं ।
मिटक्या मारीत प्यायचं ।
आठवलं ना आतां ?
किशोर— ( मिटक्या मारीत ) होय ग होय,
गौरीची आरास, फुलांचा सुवास,
मैत्रिणींचा सहवास ।

थट्टेचा सारा मनमोकळा विलास।
ऐक्याचा विकास।
आठवलं हं आतां, तीच कां तूं गौर ?
हा घे तुला नमस्कार।
[ नमस्कार करतो, ]

मुलगी— होतों आम्ही पुढं।
[ मुलगा व मुलगी जातात ]

किशोर— पण हा कोण आला इकडं ?
जिरेटोप डोक्यावर।
हातांत आहे तलवार,
पायांतली सुरवार।
मराठ्यांचे राजे, शिवाजी राजे,
आले कीं काय इथं ?
[ शिवाजीच्या वेषांत एक मुलगा व दुसरा मराठी मावळ्याच्या वेषांत येतात. मावळा ललकारी करतो. ]

मावळा— गोब्राह्मण प्रतिपालक,
छत्रपती श्री शिवाजी महारा ऽ ऽ ज
[ शिंग वाजवतो ]

किशोर— शिवाजी महाराज कीं जय।
आहे कां अभय ?
बोलूं कां महाराज ?
काय आहे आज ?

मावळा— जयन्तीचा उत्सव।
महाराजांचा गौरव, मराठ्यांचं वैभव।
स्मृति ठेवून वाढवायचं, समजलं का पोरा ?

किशोर— हा घे तुझ्या राजाला मानाचा मुजरा।
[ तीन वेळां मुजरा करतो. ते दोघे जातात. ]

पण ह्या कोण आल्या भराभरा।

[ दोन मुलीं हातांत पूजासाहित्य घेऊन येतात. सांवळ्याचीं पातळें नेसून, अंगावर दागिने घालून घाईघाईनें जात आहेत. ]

किशोर-- कुठं चाललांत ग तुम्ही ?

१ली मुलगी- वडाच्या पूजेला चाललों आहों आम्ही।

२री मुलगी-पुण्यशील सावित्रीची,
आठवण आज करायची, वटपूजा करायची।

किशोर— होय ग होय, आहे माहीत मला।
सावित्रीचा निश्चय-नाहीं मृत्यूचं भय।
निष्ठेचा विजय, भाग्याचा उदय।

मुली-- म्हणशील तेवढं थोडं, पण जातों आम्हीं पुढं।
उशीर झाला आम्हांला।
( त्या जातात. )

किशोर— ह्या कसल्या पताका ?
आषाढ महिना आला कां ?

[ एक मुलगा वारकऱ्याच्या वेषांत व एक मुलगी वारकरणीच्या वेषांत, हातांत पताका घेऊन येतात ]

किशोर— कुठून आली फेरी ?

मुलगा— पंढरीचे वारकरी। विठ्ठलाचे पुजारी।

मुलगी-- सांवळा आमचा श्रीहरी।
सारीं दुःख दूर करी।

मुलगा— हातांत घेऊं टाळ।

मुलगी— गळ्यांत तुळशी माळ।

किशोर-- मुखामध्यें विठ्ठल।
भक्ती तुमची अढळ
भगवंताचे लाडके। पूज्य देवासारखे।
दंडवत घालतों तुम्हांला।
सांग माझा नमस्कार विठोबारायाला।

[ त्यांना दंडवत घालतो. तीं दोघें मोठयानें ' पुंडलीक वरदा ह ऽऽरी विठ्ठऽऽल ' करीत, टाळ वाजवीत जातात ]

**किशोर—** **गात गात कोण आलं ?**
**गोड गोड सुरांनीं मन कसं आनंदलं ।**

[ २,३ मुली गात, नाचत येतात हातांत, पूजासाहित्य आहे ]

**मुली—** **' चल ग सखे वारुळाला, वारुळाला, वारुळाला**
**नागोबाला पूजायाला, पूजायाला, पूजायाला**

**किशोर—** **नागोबाची पूजा, वारुळाची पूजा ।**
**घेऊन जा ग बायांनो नैवेद्य हा माझा ।**

[ त्यांना दुधाची वाटी देतो. त्या म्हणत म्हणत जातात. इतक्यांत एक गारुडी टोपली घेऊन येतो. ]

**गारुडी—** **नागोबाला दुध द्या ।**
( टोपली उघडतो नाग दाखवतो. )
**नागोबाला नैवेद्य वाढा, पदरीं पुण्य जोडा ।**

**किशोर—**( नाग पाहून घाबरतो )
**नागवाला, नागवाला ही घे बाबा दिडकी ।**
**पण नागोबाला झांक कीं ।**
**मला वाटते भीति ।**

[ गारुडी दिडकी कपाळाला लावतो व सलाम करून जातो. ]

**किशोर—** **तिरंगी झेंडा फडकत फडकत आला ।**
**कशाला हा झेंडा ?**

[ एक मुलगा हातांत तिरंगी नि घेऊन येतो. [

**मुलगा—** **काय आहेस वेडा ।**

**किशोर—** **कोण रे तूं दुष्ट ? वेडा म्हणतो मला ।**

**मुलगा—** **अरे मी पंधरा ऑगष्ट । होऊं नको रुष्ट ।**

**किशोर—** **ओहो ! ओहो ! स्वातंत्र्याचा दिवस ।**
**परक्यांची सत्ता, घालवलीस कीं बेट्या ।**

हसूं नकोस हो मला, दुष्ट म्हटलं तुला।
वेडा म्हटलंस ना मला।
( तो मुलगा जातो )

[ २–३ मुलगे मुंबईच्या बालू लोकांच्या वेषांत, हातांची साखळी करून, अर्धवट भिजलेल्या कपड्यांनीं म्हणत म्हणत येतात ]

मुलगे-- ' गोविंदा आला रे ऽ आ ऽ ऽ ला
तो ××× शाळेवाला ' ( पुन्हां पुन्हां म्हणतात )

किशोर-- श्रीकृष्ण जयन्तीची।
मजा आहे नाचण्याची।
गोकुळचा आनंद
लुटताहेत नुसते

१ ला मुलगा--मजा आहे मोठ्ठी। कामाला सुट्टी।

किशोर-- ओले ओले। चिंब झाले
वाजत नाहीं कां थंडी?
फोडलीत वाटतं हंडी?

२ रा मुलगा-- नाहीं रे मुळींच
दिवसरात्र नाचायचं।
खायचं, प्यायचं, खेळायचं।

किशोर-- चैनच आहे तुमची।
पण ह्यां मात्र तुमची
स्वारी डाराडूर झोंपायची।

[ ते मुलगे नाचत, ' आला रे आला ' म्हणत जातात )

किशोर-- ही कोण आली? ( एक मुलगी येते )
अडखळत, धडपडत?
हं, हं, समजलं. हरितालिकेची पूजा।
उपासाचा गाजावाजा।
मुली, ए मुली जीव दमला बघ तुझा।
भकेलेली दिसतेस, खातेस कां कांहीं?

मुलगी-- बाई, बाई, बाई,
कडकडीत उपास, शंकराचं व्रत खास।
उगाच कसं मोडायचं? मला नाहीं हो चालायचं।
असेल जिची निष्ठा, तिला पति मिळेल मनाजोगता

किशोर— शाब्बास, शाब्बास, आहेस खरी पतिव्रता।

मुलगी-- जातें रे बाबा, करायची आहे आरती।

किशोर-- उत्कट आहे भक्ती।

[ एक मुलगा 'मोरया रे बाप्पा, मोरया रे' असें म्हणत झांजा वाजवीत येतो. पुन्हां पुन्हां म्हणतो ]

किशोर— ओऽहो, ओऽहो, गणपती का आले ?
नकला नि पोवाडे, गाणीं नि मेळे।
दहा दिवस गंमत
नारळाची खिरापत।

मुलगा -- घराघरांतून, चाळींचाळींतून,
गल्लीगल्लींतून, वाडीवाडींतून
मजाच मजा।
गणपति बाप्पा मोरया।

[ मुलगा जातो ]

[ २-३ लहान मुलें-मुली पाटीपूजनाला जातात. पाठोपाठ तलवार ढाल घेऊन कुणी वीर जात आहेत. ]

किशोर — दसऱ्याचा सण।
चाललंय पाटीपूजन।
शस्त्रांची पूजा।
विद्येची पूजा।
दसरा म्हणजे जणुं, सणांचा राजा।

मुलगा— किशोर, किशोर,
हें घे तुला सोनं, ठेव हो तें जपून।

किशोर-- आपट्याचं पान ।
पण आज त्याचा मान ।

[ श्रीशंकरपार्वती येतात ]

पार्वती--पाहुं या ना आपण, कोण करतंय् जागरण ।

शंकर--चल चल पार्वती, पाहूं आपण 'को जागर्ति'

[ किशोर त्या दोघांना पहातच नाहीं, कारण ते त्याला दिसत नाहींत ]

किशोर— कोजागिरी कोजागिरी ।
चांदण्याची माधुरी ।
आटीव दूध प्यायचं ।
जागरण करायचं ।
डाव बसायचे पत्त्यांचे, सण आहेत मजेचे ।
बैठक बसायची गाण्याची ।
चैन आहे आमची ।

[ आंतून एक मुलगी नटूनथटून-दोन्हीकडून दोन मुलींनीं दिवे हातांत घेऊन तिच्या बाजूंनीं चालत-अशी येते ]

किशोर— हा कसला प्रकाश ?
दिव्यांची आरास ।
दिवाळि देवी, नटुनथटुन आली ।
दिव्यांचा झगझगाट, फटाक्यांचा कडकडाट ।
लाडू, शेव, चकली । करंज्या नि कडबोळीं ।
चार दिवस खायचं ।
आनंदांत रहायचं !

[ एक मुलगा व एक मुलगी येतात ]

किशोर— हीं कोण दोघं
भावाच्या कां मागंमागं ?
समजलं, समजलं,

भावाशीं भांडण, आज नाहीं चालायचं ।
आंजारायचं, गोंजारायचं ।
खायला द्यायचं, ओंवाळायचं ।
अन् मग मोठ्ठं बक्षिस उपटायचं ।
होय ना ग मुली ?

मुलगी— तुझी बहीण कुठं गेली ?

[ तीं दोघें जातात ]

[ किशोरची बहीण येते ]

सुनीला— किशोर भाऊ, किशोर ।
किती झाला उशीर
उठा ना महाराज । भाऊबीज आहे आज ।
चल चल लौकर ।
आंघोळ नाहीं कां करायची

[ किशोर जागा होतो ]

किशोर— होय ग होय, अन् ताईला आमच्या ।
ओंवाळणी द्यायची ।

[ तीं दोघें हंसत हंसत जातात ]



[ छत्रपति शिवाजी १०, १२ वर्षांचे असतात त्या वेळी. ]

शिवाजी— तान्या, ए जान्या,
बाजीबा, ए माना।
लौकर इकडे या ना।

[ तानाजी, मानाजी, बाजी, येशा, जानू वगैरे मराठ्यांची मुलं प्रवेश करतात. त्यांतील एकदोघांजवळ लहानशा तलवारी आहेत ]

तानाजी— काय म्हणतायसा आज ?
मघाधरनं हटकताय ?

जानू— बोला बोला, काय बी बोला
कसला खेळ खेळायचा।

शिवाजी— खेळ खेळायचा राज्याचा।

बाजी— राज्याचा अन् खेळ।
लई बाबा वंगाळ।

जानू— व्हईल सारा खेळखंडोबा।
नग नग शिवबा।

येशा— आपल्यासारख्या पोरांना
कसं व्हावं राज्य ?

तानाजी--अरं पन या राज्यामधि
राजा कोन म्हनार ?
बाजी-- तूंच आमचा राजा
तूंच संभाळ राज्य ।
पर मदतीला ह्ये पठ्ठे
येतील मग महाराज ।
पर खरं सांगूं म्हाराजा ?
आपल्याला आवडतो
लढाईचा खेळ
काय रे तान्या ?
तानाजी-- हां रे हां, तो लई पसंत
शिवाजी--राज्याचा खेळ, नका म्हणूं बंगाळ ।
आपण कोण रे सारे ?
तानाजी-- जातिवंत मराठे
जानू-- पराकरम् दावूं इथं ?
[ तलवार काढतो ]
शिवाजी--( हसून ) हो हो तर ,
पण शत्रूच्या सैन्यावर ।
कोण आपला शत्रू ?
जानू-- तूं नग सांगूं
मना हाय् माहीत
अरं तो दिल्लीचा . . . .
शिवाजी--मराठ्यांचं राज्य,
स्थापन करायचं ।
भगवं आपलं निशाण
फडकवीत ठेवायचं ।
गनिमाला आपल्या
नामोहरम करायचं ।

तानाजी-- तलवारीची धार ।
करील शत्रू बेजार ।
बाजी-- होय रं होय गड्या
मर्द मराठे हाओ आमी ।
कावा आमचा गनिमी !
शिकवलंय शिवाजींनी
शिवाजी--आहे ना तयारी ?
बरं पण आतां, राज्याचा खेळ
कोण कोण खेळतं ?
बाजी-- आमाला नाय समजत
फक्स्त समजतं, तलवारीचं पातं ।
जानू-- शत्रूच्या रक्तानं होऊन जातं तृप्त ।
तानाजी-- चला रं खेळूं एक डाव
पर शिवबा,
तूं हो बाबा राजा
चल बस आमच्या म्होरं ।
येशा-- या इथं दगडावर ।
हातांत घे समशेर ।
अन् चालव आपलं राज्य
शिवाजी--असं नाहीं रे येशा,
मी एकटा कसं चालवूं,
तुमच्यावर माझी भिस्त ।
कराल ना मला मदत ?
तानाजी-- हा काय सवाल झाला ?
काय काम करूं, बोला ।
शिवाजी-- अरे राजा असतो एकटा,
पण जिवाला जीव देणारा
प्रधानच मोठा ।
तानाजी-- मी होतो प्रधान

जानू--   मीच होतों न
बाजी--   अन् मी कां नको रे ?
येशा--   मला नाहीं करणार कारे ?
शिवाजी—बरं बरं, छानच सुचवलंत
सगळेच व्हा प्रधान ।
म्हणजे बसेल राज्याचं बस्तान ।
तानाजी—अरं पर आमाला काम
जानू—   आम्ही काय करायचं ?
शिवाजी—अरं सोपं आहे तें
एकानं महसूल, दुसऱ्यानं न्याय ,
तिसऱ्यानं धर्म, चवथ्यानं सैन्य ।
अशीं कामं वाटायचीं
येशा--   युगत पर युगत काढलीन्
शिवाजी राजा, हायस खरा महाराजा
जानू—   कुठून आनलंस हें शानपन ?
येशा—   अक्षी राजावानी रूप, गुन ।
बाजी--   न्यारंच याचं लक्षण ।
राज्याला शुभशकुन ।
आमी सारे व्हनार तुझे प्रधान ।
अन् बघनार राज्याचा कारभार ।
शिवाजी—वा रे माझ्या मावळ्यांनो
घ्या तर आतां शपथा—
बाजी—   गनिमासमोर झुकवणार नाहीं माथा ।
येशा—   मराठी राज्याकरतां लढणार ।
तानाजी--खाल्लया अन्नाला जागणार ।
जानू   -- फंदफितुऱ्याला ठेचून काढणार ।

शिवाजी--भवानी आईचा आशीर्वाद
आईसाहेबांचा आशीर्वाद
होणार तर खरा
आणि मग होणार, मराठी राज्य झिंदाबाद ।
अन् सगळीकडे होइल आनंदीआनंद.



[ मीराबाईच्या १,३ मैत्रिणी येतात व मीराला शोधतात.

सर्वजणी ९ ते १० वर्षे वयाच्या ]

१ ली—मीरा ए मीरा।

२ री— कुठं गेला फेरा

३ री— झोंपली की काय

१ ली—खेळायला यायचं कबूल केलं तिनं

२ री— आपल्याला बोलावलन्

३ री— मग गेली कुठं ही।

काय तरि बाई।

२ री— मीरा, अग मीरा

[ मीराबाई-त्याच वयाची-हातांत कृष्णाची लहान मूर्ति झांकून घेऊन येते. ]

मीरा— हवा तेवढा ओरडा करा।

खुशाल हांका मारा।

मी नाहिं येणार खेळायला

१ ली— हा न्याय चांगला।

बोलावलंस ना आम्हांला ?

२ री— पण हें हातांत ग काय ?

३ री— दाखव तरि आम्हांला

मीरा— हात नाहीं ना लावणार ?
नाहि तर नाहीं दाखवणार

१ ली— आलीस कीं नाहीं मोठी ।
घालायला अटी ।

२ री— तें कांहीं नाहीं, लौकर लौकर दाखव बाई ।

३ री— आम्ही काय कुणी लोकं कां आहोंत
मैत्रिणी ना तुझ्या ?
काढ कीं ते पांघरूण ।

मीरा— करूं नका दणदण ।
पाहिलांत माझा कृष्ण ? ( मूर्ति दाखवते )

१ ली— अगबाई मीरा, फारच आहे न्यारा ।

२ री— हातांत दे की जरा, असं काय करतेस मीरा ?

मीरा— हात नका लावूं गडे, व्हा ना जरा तिकडे
हा पहा माझा देव । ( दुरून दाखवते )
पृथ्वीमोलाची ठेव ।

३ री— देव आहे तुझा, पण करणार कोण पूजा ?

मीरा— आहा ग वेडी । मी नाहीं कां धवडी ?
हा माझा भगवन्त, मी त्याची भक्त
सकाळ नि संध्याकाळ ।
भजनांत घालवीन काळ ।

१ ली— मग आमच्याशीं खेळायला
नाहींच मिळणार वेळ ।

२ री— मशानं आम्ही गडी-फू करूं

मीरा— अग पण आपण सगळ्या मिळून भजन करूं ।
१ ली-- अग पण मीरा याला ठेवणार तूं कुठं ?
मीरा— कुठं म्हणजे ? इथं [ देव्हारा दाखवते ]
पण तुम्हांला दाखवायला ।
२ री— म्हणजे काय बाई
मीरा-- अग माझ्या मैत्रिणींनो,
नाहीं तुम्हांला माहीत ।
पाहिल्याबरोबर मूर्ति
उगवली भक्ती ।
अन् देवाची या स्थापना
झाली माझ्या हृदयांत ।
३ री-- कुठं ठेवूं न् कुठं नको
असं झालंय हिला
१ ली— आतां काय आमची मीरा
संतीण होणार ।
२ री-- हातांत टाळ घेणार ।
३ री-- दिवस अन् रात्र भजन करीत बसणार ।
मीरा— होयच मग, मीरेचा प्रभु, प्रभूची मीरा ।
मीरा के प्रभु गिरिधर नागर ।
[ सुरांवर म्हणते ]
३ री— झाला ग अंगांत भक्तीचा संचार ।
[ मीराबाई मूर्तीकडे पहात पहात गाणे म्हणते व तल्लीन होते. ]
१ ली-- अग अग मीरा, इकडे पहा जरा ।
२ री-- विसरलीस कां आम्हांला ।
३ री— करूं दे ग भजन तिला ।
नका करूं गलबला ।

अडवूं नका तिला ।

१ ली--खरंच ग खरंच, आवाज हिचा सुंदर ।

२ री-- प्रभूच्या भक्तीनं फुललं हिचं अन्तर ।

मीरा--' तुम बिन मेरी, कोन खबर ले
गोवर्धन गिरिधारी '

सगळ्याजणी ऐकत बसतात. ]

मीरा— देवाधिदेवा,
गोड करून घे माझी ही सेवा ।
तुला पाहिलं कीं हरि, तहानभूक जाते सारी ।
तुझ्याशिवाय देवा, नाहीं मला विसांवा ।
तूंच माझा आसरा, तुझीच ना मीरा !
द्रौपदीमाईची राखलीस ना लाज ?
प्रल्हादाच्या भक्तीचं केलंस तूं चीज ।
विदुराच्या कण्या, शबरीचीं बोरं
आवडीनं मोठ्या केलीस तूं सेवन ।
तुझ्या ठिकाणीं भगवन्, रमलं माझं मन ।
घे मला पदरांत ।
होऊं दे विलीन
सारं माझं जीवन ।

[डोकं ठेवते व डोळे मिटून नमस्कार करते ] [ आई येते. ]

मीरा ए मीरा, निवून गेलं अन्न ।
चल आतां जेवायला ।
किती बरं उशीर झाला ?

मीरा— येतें हं आई,
जराशी थांब, थांब ना ग थोडी ।
राहिली मानसपूजा, ती करून येतें तेवढी ।
लवकरच येतें हं ।

मीरा—( देवाला ) बरं कां देवा,
आईचा शब्द ऐकायलाच हवा।
जेवण झालं कीं मी ताबडतोब येतें।
अन् सेवेला तुमच्या हजर मी होतें।
बरं कां प्रभू, मीरा के प्रभू।

☆ ☆ ☆